**महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या मार्फत राष्ट्रीय कृषि विकास योजनेतुन प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत**

**महाराष्ट्रातील गोदामांचे तळवट अद्ययावत करणे व गडचिरोली, भंडारा, गोंदिया व चंद्रपूर जिल्हयातील वखार संकुलामधील रस्त्याचे कॉन्क्रीटीकरण करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वखार१४१७/प्र.क्र.१४२/९-स**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २३ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-**

राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २३ वी बैठकीचे इतिवृत्त शासन पत्र क्र. RKV ०३१७/C.R.१४/RKVY CELL, दि. ९.६.२०१७

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत केंद्र शासनाने प्रसिद्ध केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली दि. २० सप्टेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती (SLSC) गठीत करण्यात आलेली आहे. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २३ वी बैठक दि. २५ मे, २०१७ रोजी पार पडली. या बैठकीमध्ये महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांत रासायनिक खतांच्या साठवणूकीमुळे गोदामांचे तळवट अन्नधान्य साठवणूकीसाठी योग्य राहिलेले नाहीत किंबहूना हानीकारक झाले आहेत. तसेच कापूसगाठींच्या साठवणूकी वेळी हाताळणी होत असताना गोदामांचे तळवट फुटण्याचे प्रमाण मोठे आहे. अशा एकूण १,६७,५२० मे.टन साठवणूक क्षमतेच्या गोदामांमध्ये अन्नधान्याची शास्त्रोक्त पद्धतीने साठवणूक करणे शक्य होत नसल्याने सदर सर्व गोदामांचे उन्नतीकरण (Up gradation) करणे निकडीचे झालेले आहे. गोदामाच्या उन्नतीकरणा अभावी विविध ठिकाणच्या शेतकरी, व्यापारी व साठवणूक दरांना कृषिमालाच्या साठवणूकीसाठी अडचणींचा सामना करावा लागत आहे. तसेच वखार संकुलात मुरुम किंवा खडीचे कच्चे रस्ते असल्याने गोदामांमध्ये साठवणूक केलेल्या अन्नधान्यांच्या थप्प्यांवर मोठ्याप्रमाणात धुळ जमा होते. सदरची धुळ ही तागाच्या बारदान्यामधून बऱ्याचशा प्रमाणात अन्नधान्यात मिसळली जाते. तसेच पावसाळी वातावरणात वखार संकुलातील रस्ते, रस्त्याचा पाया मानकांप्रमाणे नसल्यामुळे वाहतूक योग्य राहत नाहीत, त्यामुळे पावसाळी दिवसामध्ये शेतकरी, व्यापारी व साठवणूकदारांना गोदामात जागा शिल्लक असले तरी त्याचा वापर करता येत नाही. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाकडील मर्यादित उत्पनाचे स्रोत व उपलब्ध निधीचा विचार करता, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळास गोदामांचे उन्नतीकरणाचा एकत्रित कार्यक्रम राबविणे शक्य नसल्याने इत्यादी बाबी

विचारात घेता महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांचे तळवट शास्त्रोक्त साठवणूकीसाठी उन्नत करणे व व गडचिरोली , भंडारा, गोंदिया आणि चंद्रपूर जिल्ह्यातील वखार संकुलामधील रस्त्यांचे कॉंक्रिटीकरण करणेच्या प्रकल्पासाठी एकूण रू. ३१.९९ कोटीच्या खर्चास दि. २५ मे २०१७ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. प्रकल्प खर्च रू. ३१.९९ कोटी मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेकडून रू. २३.९९ कोटी व महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाकडून रू. ८.०० कोटी खर्च करण्यात येणार आहे. प्रकल्पासाठीच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

०१. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. २५ मे, २०१७ रोजी संपन्न झालेल्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या २३ व्या बैठकीत मंजूर करण्यात आलेल्या, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ मार्फत महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांचे तळवट शास्त्रोक्त साठवणूकीसाठी उन्नत करणे व व गडचिरोली , भंडारा , गोंदिया आणि चंद्रपूर जिल्ह्यातील वखार संकुलामधील रस्त्यांचे कॉंक्रिटीकरण करण्याच्या प्रकल्पासाठी रू. ३१.९९ कोटीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान हे Integrated Scheme for Agricultural Marketing यांच्या खर्च निकषांनुसार राहील.

०२. सदर कामांचा CSR/DSR नुसार अंदाजित खर्च व अनुदान यातील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ स्वत:च्या निधीतून भागवेल. सदर प्रकल्पाचा घटकनिहाय अनुदानाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रूपये कोटीत)

| अ.क्र. | तपशील | एकूण खर्च | RKVY अंतर्गत मंजूर अनुदान | MSWC चा सहभाग |
|---|---|---|---|---|
| १ | गोदामांचे तळवट अद्ययावत करणे | २१.३३ | १५.९४ | ५.३९ |
| २ | रस्ते कॉंक्रीटीकरण करुन अद्ययावत करणे | १०.३५ | ७.७४ | २.६१ |
| ३ | प्रशासन खर्च | ०.३१ | ०.३१ | - |
| **एकूण** | | **३१.९९** | **२३.९९** | **८.००** |

०३. सदर शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान रू. २३.९९ कोटी खर्च करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाने सदर सर्व कामांचे नियमांनुसार खर्चाचे अंदाजपत्रके व नकाशे तयार करून घेऊन नियमित पद्धतीनुसार कामांस प्रशासकीय मान्यता द्यावी.

२) सदर प्रकल्प/योजना राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ अमंलबजावणी यंत्रणा म्हणून काम पाहील. संबंधीत यंत्रणांनी सदर प्रकल्प/योजना राबविताना त्याची अमंलबजावणी, संनियंत्रण आणि मुल्यमापन करणेबाबत आवश्यक तो समन्वय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांच्याशी ठेवावा. तसेच वेळोवेळी प्रकल्प अंमलबजावणी विषयक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल पणन विभागास सादर करावा.

३) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाचे अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक यांनी समिती गठीत करून, प्रकल्पांच्या आर्थिक व भौतिक उद्दिष्टांचा आढावा घ्यावा.

४) वरील प्रकल्प / योजनांची अमंलबजावणी संनियंत्रण व मुल्यमापन केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या निकषांनुसार अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यांनी करावे.

५) या प्रकल्पाकरीता उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यांच्या स्वाक्षरीने किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने कृषि विभागास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२३१५२३०३२५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra S Pujari

Digitally signed by Mahendra S Pujari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b5a303a1aac7ca1cc574b4617cc25b1634df3f64ec897959300a5d5688c1454, cn=Mahendra S Pujari
Date: 2017.08.23 15:13:44 +05'30'

**( महेंद्र पुजारी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत**

१. मा. विरोधी पक्ष नेते विधानसभा व विधानपरिषद
२. सर्व मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

४. मा. राज्यपाल यांचे सचिव
५. सर्व मा. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. प्रधान सचिव (कृषि व पणन) मंत्रालय, मुंबई.
७. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वखार महामंडळ, पुणे.
८. उप सचिव (पणन), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. कक्ष अधिकारी, राकृवियो/६अे/७अे, कृषी व पदुम विभाग
११. निवड नस्ती.